संगणक सांकेतांक - २०१७०५०३१२२२५०१३०७

**लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांच्याकडून प्राप्त होणाऱ्या पत्रव्यवहारावर करावयाच्या कार्यपध्दतीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

शासन परिपत्रक क्रमांक : एलपीएल-१२०२/प्र.क्र. ५६ /२००२/१५,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक : २० जून २००२

**पहा :-** शासन परिपत्रक, सा.प्र.वि. क्र. एलपीएल-१०००/प्र.क्र. १११/२०००/१५,दि. ८ मार्च २००१

## शासन परिपत्रक

महाराष्ट्र लोक आयुक्त व उप लोक आयुक्त अधिनियम १९७१ अन्वये लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांच्याकडुन प्राप्त होणा-या पत्रव्यवहारावर करावयाच्या कार्यपद्धतीबाबत एकत्रित सुचना संदर्भाधीन परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या आहेत. त्यामध्ये प्रामुख्याने खालील बाबींचा समावेश आहे.

१) लोक आयुक्त व उप लोक आयुक्त ही पदनामे वर्णलेखनारुप लिहिणे.

२) लोक आयुक्त व उप लोक आयुक्त कार्यालयांशी पत्रव्यव्हार करावयाची कार्यपद्धती.

३) लोक आयुक्त किंवा उप लोक आयुक्त यांनी सक्षम प्राधिका-यांना केलेल्या शिफारशीवरील अनुपालन अहवाल विहित मुदतीत पाठविणे.

४) लोक आयुक्त किंवा उप लोक आयुक्त यांनी सादर केलेल्या विशेष अहवालावरील कार्यपद्धती.

५) लोक आयुक्त तसेच उप लोक आयुक्त यांचेकडील सुनावणीच्यावेळी अधिका-यांनी उपस्थित राहणे.

६) लोक आयुक्त तसेच उप लोक आयुक्त यांना तक्रारी / गा-हाणी यांच्यासंदर्भात अन्वेषणासाठी कागदपत्र उपलब्ध करुन देणे.

७) लोक आयुक्त किंवा उप लोक आयुक्त यांनी केलेल्या शिफारशींवरील अनुपालन अहवाल सक्षम अधिका-यांमार्फतच पाठविणे.

विधी मंडळाच्या कामकाजास जसे प्राथम्य दिले जाते तसे प्राथम्य लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांच्या कामकाजाला देण्यात यावे असे शासनाचे आदेश आहेत. तथापि, उपरोक्त बाबींसंदर्भात विहित करण्यात आलेल्या कार्यपद्धतीचे अनुपालन काही विभाग / कार्यालयाकडून होत नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे.

यास्तव, उपरोक्त परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या सूचनांचा पुनरुच्चार करण्यात येत आहे. सर्व मंत्रालयीन विभाग / विभाग प्रमुख तसेच कार्यालय प्रमुख यांनी लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचेकडुन प्राप्त होणा-या कामकाजाबाबत विहित करण्यात आलेल्या कार्यपद्धतीचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता घ्यावी. ज्या अधिकाऱ्यांकडून /कर्मचाऱ्यांकडून याबाबत निष्काळजीपणा केला गेला किंवा कालमर्यादेचे उल्लंघन केले गेले असे निदर्शनास येईल त्या शासकीय अधिकारी / कर्मचारी यांच्या गोपनीय अभिलेख्यामध्ये सदर बाबीची नोंद घ्यावी.

या परिपत्रकातील सूचना सर्व अधिकारी / कर्मचारी यांच्या कृपया निदर्शनास आणाव्या.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(भि. रा. वाळवे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

मा.राज्यपाल यांचे सचिव,राजभवन,मुंबई,
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मुंबई,
मा.उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मुंबई,
शासनाचे मुख्य सचिव,सामान्य प्रशासन विभाग,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव,
शासनाचे सर्व प्रधान सचिव / सचिव,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, (पत्राने)
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग /कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

